(९२)

201408271623379508

राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई व भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व प्रशिक्षण केंद्र, कोल्हापूर, नागपूर आणि औरंगाबाद.
प्रशिक्षणार्थीच्या विद्यावेतनात वाढ करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्र. आयएएस २०००/(९/२०००)/मशि-२,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १७ सप्टेंबर, २००३.

पहा : १) शासन पत्र, शिक्षण व सेवायोजन विभाग, क्र. आयएएस-११८७/ ११६९/विशि-२, दि. २०.२.१९८८.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, क्र. आयएएस १०९१/(१८१४)/विशि-२, दि. २५ मे, १९९२.
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. प्रिआयएएस-१०९९/प्रशा-३, दिनांक ४.५.२०००.
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. प्रिआयएएस-२००२/विद्यावेतनवाढ/१०९६७/प्रशा-३, दिनांक १४.५.२००२.
५) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. प्रिआयएएस-२००२/विद्यावेतन वाढ/प्रशा-३, दिनांक ११.३.२००३ व दि. २९.४.२००३.

## शासन निर्णय

राज्यात मुंबई, कोल्हापूर, औरंगाबाद व नागपूर या ४ ठिकाणी भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व प्रशिक्षण संस्था कार्यरत असून सदर संस्थांची प्रवेशक्षमता प्रत्येकी ६० विद्यार्थी इतकी आहे. यापैकी मुंबई येथील राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था महाराष्ट्रात प्रथम १९७६ मध्ये स्थापन करण्यात आली. त्यानंतर नागपूर, औरंगाबाद व कोल्हापूर या तीन ठिकाणीही १९८५ मध्ये अखिल भारतीय सेवा पूर्व प्रशिक्षण केंद्र सुरु करण्यात आली आहेत. सदर संस्थांमधील प्रशिक्षणार्थी विद्यार्थ्यांना विनामुल्य प्रशिक्षण दिले जात असून शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, क्र. आयएएस १०९१/(१८१४)/विशि-२, दि. २५ मे, १९९२ अन्वये रु. १५०/- मासिक विद्यावेतन दिले जाते. मुंबई येथील राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्थेच्या बाबतीत मात्र मुंबईबाहेरील ज्या विद्यार्थ्यांना संस्थेच्या वसतीगृहात (३० प्रवेशक्षमता) प्रवेश देण्यात येतो, त्या विद्यार्थ्यांना शासन पत्र, शिक्षण व सेवायोजन विभाग, क्र. आयएएस-११८७/११६९/विशि-२, दि. २०.२.१९८८ अन्वये रु. ४००/- मासिक विद्यावेतन दिले जाते. सध्याच्या महागाईच्या तुलनेत सदर विद्यार्थ्यांच्या बाबतीत देण्यात येणारे रु. १५०/- मासिक विद्यावेतन फारच कमी असल्यामुळे त्यामध्ये वाढ करण्याची शिफारस महाराष्ट्र विधान मंडळाच्या स्थायी समितीने केली होती. त्यास अनुसरुन सदर भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व प्रशिक्षण संस्थांमधील विद्यार्थ्यांच्या मासिक विद्यावेतनात वाढ करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधिन होता.

२. शासन आता या निर्णयाद्वारे राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई व भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व प्रशिक्षण संस्था/केंद्रे, कोल्हापूर, नागपूर, औरंगाबाद येथील विद्यार्थ्यांचे मासिक विद्यावेतन सन २००३-२००४ या शैक्षणिक वर्षापासून रु. १,०००/- (रुपये एक हजार फक्त) एवढे करण्यास मंजूरी देत आहे.

(कृपया मागे पहा.)

३. विद्यावेतनात वाढ केल्यामुळे येणारा खर्च खालील योजनेतर व योजनांतर्गत लेखाशीर्षांतर्गत दर्शविण्यात येऊन तो त्या खालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

योजनेतर लेखाशीर्ष : २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८०, सर्वसाधारण, ००३, प्रशिक्षण, (०२)(०१) राज्य प्रशासकीय सेवा संस्था (२२०२११३३)

योजनांतर्गत लेखाशीर्ष : २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८०, सर्वसाधारण, ००३, प्रशिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२)(०२) राज्य प्रशासकीय सेवा संस्था (२२०२११४२)

४. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३१७/२००३/व्यय-५, दिनांक ६ जुलै, २००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सु. द. पडवळ)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई, पुणे, औरंगाबाद, जळगांव, नांदेड, कोल्हापूर, नागपूर, अमरावती.
संचालक, राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई.
संचालक, भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व प्रशिक्षण संस्था/केंद्र, कोल्हापूर, नागपूर, औरंगाबाद.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषाधिकारी, नागपूर, कोल्हापूर, औरंगाबाद.
नियोजन विभाग/वित्त विभाग.
खाजगी सचिव, मा. मंत्री, उच्च शिक्षण.
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण.
स्वीय सहाय्यक, मा. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण.
उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व सहसचिव, उप सचिव, अवर सचिव व कार्यासन अधिकारी.
उच्च व तंत्र शिक्षण विभाग (कार्यासन-साशि-१)
निवडनस्ती/मशि-१.

196